राज्यातील ग्रामपंचायतीमध्ये "आपले सरकार सेवा केंद्रामार्फत (ASSK)" पुरविण्यात येणाऱ्या सेवांसाठी ग्रामपंचायतींमार्फत निधीची तरतूद करणेबाबत मार्गदर्शक सूचना.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पेमेंट ४७१९/प्र.क्र.७ आसक

बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: १९ मे, २०२०.

**संदर्भ :**

१) **शासन निर्णय क्रमांक : संग्राम-२०१५/प्र.क्र.९३/संग्राम कक्ष दि.११ ऑगष्ट, २०१६**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय दि.११ ऑगष्ट, २०१६ द्वारे राज्यातील ग्रामपंचायतीमध्ये आपले सरकार सेवा केंद्राची उभारणी व अंमलबजावणी करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या केंद्रामार्फत विविध सेवा उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. त्यासाठी या केंद्रांवर सद्यस्थितीत सीएससी-एसपीव्ही कंपनीमार्फत केंद्रचालकांची नियुक्ती करण्यात आली आहे

या सेवांसाठी सेवा पुरवठादार कंपनीस देय असणारी रक्कम ग्रामपंचायतींना मिळणाऱ्या १४ व्या वित्त आयोगाच्या निधीच्या १० टक्के प्रशासकीय निधीमधुन खर्च करु शकतील अशी तरतूद संदर्भिय शासन निर्णयाच्या मुद्दा क्र.५.६ मध्ये करण्यात आलेली आहे. या १० टक्के प्रशासकीय निधीमधुन इतर प्रशासकीय कामेही घेणे आवश्यक असल्यामुळे सदर खर्च ५ टक्के (१० टक्के प्रशासकीय निधीच्या ५० टक्के) च्या मर्यादेत असणे योग्य राहिल असेही नमूद करुन पुढे तथापि सदर निधी अपुरा पडल्यास उर्वरित खर्च १४ व्या वित्त आयोगाच्या ९० टक्के अनुदानातुन किंवा ग्रामपंचायत स्वनिधीतुन / मुक्तनिधीतुन उपलब्ध करणे शक्य असल्याचाही उल्लेख करण्यात आला आहे.

१५ व्या वित्त आयोगाच्या प्राप्त मार्गदर्शक सूचनांनुसार ग्रामपंचायतींना उपलब्ध होणाऱ्या एकूण निधीपैकी ५० टक्के निधी बंधित स्वरुपाचा असुन ५० टक्के निधी अबंधित आहे. या पार्श्वभूमीवर आपले सरकार सेवा केंद्रांमार्फत मिळणाऱ्या सेवांसाठी सेवा पुरवठादार कंपनीस अदा करावयाच्या रकमेबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

आपले सरकार सेवा केंद्रांमार्फत मिळणाऱ्या सेवांसाठी सेवा पुरवठादार कंपनीस अदा करावयाची रक्कम ही १५ व्या वित्त आयोगांतर्गत ग्रामपंचायतींना उपलब्ध होणाऱ्या ५० टक्के अबंधित निधीतुन अदा करणे शक्य आहे. मात्र ही रक्कम अबंधित निधीच्या १० टक्केच्या मर्यादेत असणे योग्य राहिल. तथापि सदर निधी अपुरा पडत असल्यास उर्वरित खर्च ग्रामपंचायत स्वनिधीतुन उपलब्ध करणे शक्य आहे. सदर केंद्रामुळे ग्रामस्थांच्या राहणीमानाच्या दर्जा उंचावणार असल्याने सदर बाब ही मानव विकास निर्देशकांशी निगडीत आहे.

२. या संदर्भातील पुढील सूचना निर्गमित होईपर्यंत संदर्भिय शासन निर्णयातील अन्य सूचना कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०२००५२११२०११४५२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f82404d3bf725fa292c76bb1649f4e73505a8c846f3f83bdee9968a87f1d6c, postalCode=400001, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2020.05.22 13:55:31 +05'30'

**( प्रविण जैन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत.

१) मा.राज्यपालाचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा.विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
४) मा.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय
५) शासनाचे मुख्य सचिव
६) शासनाचे सर्व अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व प्रशासकीय विभाग)
७) सर्व विभागीय आयुक्त
८) सर्व सह सचिव / उप सचिव (ग्राम विकास विभाग)
९) सर्व जिल्हाधिकारी
१०) मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
११) मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
१२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

१३) सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी
१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१५) सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (पंचायत / सा.प्र.वि)
१६) सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी
१७) CSC-SPV e-Governance India Ltd. इलेक्ट्रॉनिक निकेतन, तिसरा मजला, DeITY, ६ सीजीओ कॉम्प्लेक्स, लोधी रोड, नवी दिल्ली-११०००३.
१८) निवड नस्ती, संग्राम कक्ष, ग्राम विकास व पंचायत राज विभाग